**वासणी मध्यम प्रकल्पामधील बोरगांव तळणी या गावाच्या पुनर्वसनाच्या प्रस्तावास विशेष बाब म्हणून मान्यता देण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - आरपीए-१०१५/प्र.क्र.७६/र-१**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २० ऑगस्ट, २०१५

**वाचा-** विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/पुनर्व/अका/कावि-७८३२/२०१४, दिनांक ९/१२/२०१४.

**प्रस्तावना-**

अमरावती जिल्हयातील अचलपूर तालुक्यातील मौजे वासणी (बु) गावाच्या बाजुस, सपन नदीवर वासनी (बु) मध्यम पाटबंधारे प्रकल्पास विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपुर यांच्या दिनांक १४.२.२००८ च्या निर्णयानुसार रु. १०२८१.८१ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्राप्त आहे. या प्रकल्पाचा एकुण पाणीसाठा २२.५९१ द.ल.घ.मी. असुन एकुण सिंचन क्षमता ४३१७ हेक्टर आहे. प्रकल्पाचे प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यतेनुसार एकुण किंमत रु. १९८२.५० लक्ष इतकी आहे. या प्रकल्पाचे मूळ प्रशासकीय मान्यतेनुसार बोरगांव (दूरी) व बोरगांव पेठ या दोन गावांचे पुनर्वसन नियोजित आहे. परंतु बोरगांव तळणी या गावाला चारही बाजूनी धरणाच्या पाण्याचा वेढा पडणार असल्याने तसेच धरणाच्या पाण्याची पूर्ण संचय पातळी गावाच्या काठावरील घरापर्यंत येत आहे. त्यामुळे भविष्यात सदर प्रकल्पामुळे जमिनीत पाणी मुरल्यामुळे मातीची धार क्षमता कमी होऊन घरांच्या पायास सततच्या ओलीमुळे क्षती पोहचण्याची शक्यता असल्याचा अहवाल जिल्हाधिकारी अमरावती आणि अधिक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती यांनी संयुक्त पाहणी करुन सादर केला आहे. त्यास अनुसरुन विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांचे संदर्भिय पत्रान्वये मौजे बोरगांव तळणी या गावाचा विशेष बाब म्हणून पुनर्वसन करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला असून सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद वस्तुस्थिती विचारात घेऊन वासणी पाटबंधारे मध्यम प्रकल्प, मौजे बोरगांव तळणी या गावाचे **विशेष बाब** म्हणून पुनर्वसन करण्यास या आदेशाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर गावाच्या पुनर्वसनासाठी अपेक्षित एकूण रु. ९.२५ कोटी इतक्या खर्चाचा समावेश सदर प्रकल्पाच्या पुढील सुधारित प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत करण्यात यावा.

सदर आदेश जलसंपदा विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२११३३९२६१५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prasannakumar Sadanand Thakur

Digitally signed by Prasannakumar Sadanand Thakur
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prasannakumar Sadanand Thakur
Date: 2015.08.21 13:46:21 +05'30'

(प्र.स.ठाकूर)
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
२. विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती
३. जिल्हाधिकारी, अमरावती
४. सदस्य सचिव, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
५. अधिक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा प्रकल्प मंडळ, अमरावती
६. कार्यकारी अभियंता, अमरावती पाटबंधारे विभाग, अमरावती
७. जिल्हा पुनर्वसन अधिकारी, अमरावती
८. निवडनस्ती, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.